महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना अनुदान - कॅप्टन (नि.) जयंत गणेश सरंजामे, जि. मुंबई उपनगर.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.मगौपु-२०१४/(प्र.क्र.२७२/१४)/२८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २०/१२/२०१४.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२०००/३०३/प्र.क्र.३१ (२०००)/२८, दि.०३.०७.२०००.
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६/३१९७, दिनांक ०८.०८.२०१४.

**प्रस्तावना**

संदर्भाधीन दिनांक ०३.०७.२००० च्या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. ई सी ५४३६८ कॅप्टन (नि.) जयंत गणेश सरंजामे यांना सं.१००-प्रेस/६६, दिनांक ३१ डिसेंबर, १९६६ रोजी भारत सरकारच्या दिनांक ०७ जानेवारी, १९६७ च्या राजपत्रान्वये " सेना पदक" प्रदान करण्यात आले असल्याने, या योजनेंतर्गत त्यांना एकरकमी अनुदान देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्या संदर्भाधीन दिनांक ०८.०८.२०१४ च्या पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला आहे. तद्नुषंगाने अनुज्ञेय रक्कम लाभार्थ्यांस मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे अनुज्ञेय असलेली रु. २३,०००/- (रुपये तेवीस हजार फक्त) इतकी अनुदानाची रक्कम लाभार्थ्यास देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | अनुदानाची देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | ई सी-५४३६८ कॅप्टन (नि.) जयंत गणेश सरंजामे, बी ३/६, सुमन नगर, एस. टी. रोड, चेंबुर, मुंबई ४०० ०७१. | सेना पदक | ३१.१२.१९६६ | २३,०००/- |
| | | | एकूण | २३,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा रुपये २३,०००/- (रुपये तेवीस हजार फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, मुंबई उपनगर यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी याबाबतचा कार्यपूर्ती अहवाल शासनास सादर करावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२०००/३०३/प्र.क्र.३१(२०००)/२८, दि.०३.०७.२००० मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१४१२२०१६४८१६८६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DARADE PRADEEP L

Digitally signed by DARADE PRADEEP L
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DARADE PRADEEP L
Date: 2014.12.20 16:57:34 +05'30'

**प्र.ल.दराडे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय, मुंबई उपनगर,
९. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२,
१०. ई सी-५४३६८ कॅप्टन (नि.) जयंत गणेश सरंजामे, प्लॅट नं.६, बी ,६/३सुमन नगर, एस.टी. रोड, चेंबुर, मुंबई.
११. निवड नस्ती (२ प्रती),